**महाराष्ट्र कृषी सेवा गट-अ, उपसंचालक व गट-ब तालुका कृषि अधिकारी/तंत्र अधिकारी संवर्गातील तसेच महाराष्ट्र प्रशासकीय सेवा गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदली/पदस्थापना करण्यासाठी स्थापित नागरी सेवा मंडळ १(अ) समितीच्या पुनर्रचनेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. आकृवि १२२१/प्र.क्र.१४०/१५-अे**
मंत्रालय विस्तार इमारत, मंत्रालय,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १९ मे, २०२५

**वाचा** :- १) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.आकृवि १२२१/प्र.क्र.१४०/१५-अे, दि.०४.०८.२०२१.
२) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.आकृवि १२१४/प्र.क्र.४२७/१५-अे, दि.१७.०४.२०२५.

**प्रस्तावना :-**

शासकीय कर्मचा-यांचे बदलीचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी तरतुद करण्याकरिता अधिनियम २००५ अंमलात आला आहे. या अधिनियमातील कलम-६ मधील परंतुक २ व कलम ७ मधील तरतुदी नुसार शासन निर्णय दि.१७.०४.२०२५ अन्वये महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ, गट-ब संवर्गातील तसेच महाराष्ट्र प्रशासकीय सेवा गट-अ व गट-ब संवर्गातील अधिका-यांच्या बदल्या करण्यास सक्षम प्राधिकारी यांचे अधिकार प्रत्यावर्तीत करण्यात आले आहेत.

२. महाराष्ट्र कृषी सेवा गट-अ व गट-ब तसेच महाराष्ट्र कृषी प्रशासकीय सेवा गट-अ व गट-ब या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदली / पदस्थापनेबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारस करण्यासाठी शासन निर्णय दि.१९.०५.२०१६ अन्वये नागरी सेवा मंडळ-१(अ) ची स्थापना करण्यात आली असून सदर स्थापन करण्यात आलेली नागरी सेवा मंडळ-१(अ) ची पुनर्रचना दि.०४.०८.२०२१ अन्वये करण्यात आली आहे.

३. यास्तव, महाराष्ट्र कृषी सेवा गट-अ, उपसंचालक व गट-ब तालुका कृषि अधिकारी/तंत्र अधिकारी तसेच महाराष्ट्र कृषी प्रशासकीय सेवा गट-अ व गट-ब या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदली/पदस्थापनेबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारस करण्यासाठी शासन निर्णय दि.०४.०८.२०२१ अन्वये पुनर्रचना करण्यात आलेल्या नागरी सेवा मंडळ-१(अ) मध्ये खालील प्रमाणे सुधारणा करुन पुनर्रचना करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

**नागरी सेवा मंडळ-१ (अ)**

| | | |
|---|---|---|
| १ | कृषी आयुक्तालयातील सेवाज्येष्ठ संचालक | अध्यक्ष |
| २ | सह/उप सचिव (आस्थापना), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | कृषी सहसंचालक (आस्थापना), कृषी आयुक्तालय, पुणे | सदस्य |

४. नागरी सेवा मंडळ - १ (अ) सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून अस्तित्वात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०५१९१३४२३०९२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

PRAFULL
JAYARAJ THAKUR

Digitally signed by PRAFULL JAYARAJ THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=a667c77bb88ce063662f2aa699e2500c4762f460cf24044d9294538ae9317866, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=270161C25173749823DF5244F6DD301BD627572B61CB43E0B30429B8BA527568, cn=PRAFULL JAYARAJ THAKUR
Date: 2025.05.19 15:20:09 +05'30'

**(प्रफुल्ल ठाकूर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. सह/उप सचिव (आस्थापना), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. कृषि सह संचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे.
७. सर्व विभागीय कृषि सह संचालक (व्दारा आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे)
८. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (व्दारा आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे)
९. निवडनस्ती/१५-अे